**मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी स्वतंत्र लेखाशिर्षास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२४/प्र.क्र. १८६ अ/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०२५.

**संदर्भ** :- शासन निर्णय क्रमांक -संकिर्ण-२०२४/प्र. क्र. ९०/व्यशि-३, दि. ०९.०७.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील युवकांना त्यांच्या शिक्षणानंतर प्रत्यक्ष कामाचे प्रशिक्षण देऊन त्यांची रोजगार मिळण्याची क्षमता वाढविण्याकरीता संदर्भाधीन दि. ०९.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये “मुख्यमंत्री युवा कार्यप्रशिक्षण योजना” कार्यान्वित करण्यात आली आहे. मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेची वित्तीय व्याप्ती मोठ्या प्रमाणावर आहे. त्याबाबतच्या खर्चाचे क्षेत्रनिहाय (Sector wise) व्यवस्थापन करता यावे, यासाठी योजनेंतर्गत सर्वसाधारण / अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती या करीता स्वतंत्र लेखाशिर्ष प्रस्तावित करण्यात यावेत, अशा सूचना वित्त विभागाकडून प्राप्त झाल्या होत्या. त्यानुषंगाने मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष मिळण्याकरीता सादर केलेल्या प्रस्तावास वित्त विभाग तसेच मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) यांनी सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी स्वतंत्र लेखाशिर्षास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी खालीलप्रमाणे स्वतंत्र लेखाशिर्षास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

| मराठी | | | इंग्रजी | | |
|---|---|---|---|---|---|
| मागणी क्रमांक | झेडए-०२ | | Demand No. | ZA-02 | |
| मुख्य लेखाशीर्ष | २२३० | कामगार, सेवायोजन व कौशल्य | Major Head | 2230 | Labour, Employment and Skill Development |
| उपमुख्य लेखाशीर्ष | ०३ | प्रशिक्षण | Sub Major Head | 03 | Training |
| गौण शीर्ष | १०२ | शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण | Minor Head | 102 | Apprenticeship Training |
| गट शीर्ष | (०१) | शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण | Group Head | (01) | Apprenticeship Training |
| उप गट शीर्ष | (०१)(०४) | मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना (कार्यक्रम) | Sub Group Head | (01)(04) | Chief Minister Youth Work Training Scheme (Scheme) |
| आठ अंकी संकेतांक- २२३०ए८९१ | | | C. R. C. Code- 2230A891 | | |

२. सदर शासन निर्णय मा. महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र, मुंबई यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ख. वि/चा-१/ कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/युओआर- 272/2024-25/2214, दि. ०४.०२.२०२५ तसेच वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४७/व्यय-६, दि. ०९.१२.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१७१७२४११२१०३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2025.04.17 17:24:59 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव
२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
६) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
८) निवडनस्ती- कार्यासन प्रशा-२